**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१०-२०११**

३६०४ - स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. १०१, जमीन महसूल (एक) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ व मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ अन्वये जिल्हा परिषद व पंचायत समिती व ग्रामपंचायतींना जमीन महसूल , जमीन समानीकरण व उपकर अनुदान इत्यादी संबंधात अभिहस्तांकित रकमा देणे ( ३६०४०४७९).

**ग्राम पंचायतींना जमीन समानीकरण अनुदाने**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. बीजीटी २६१०/प्र.क्र.८५ /पंरा-४
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक :- १८ फेब्रुवारी, २०११.

वाचा - १) शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्र. व्हीपीएम १३७८/१२७७/सीआर ११६३/२४, दिनांक २२.४.१९९२.

२) शासन निर्णय, समक्रमांक, दि.३०.४.२०१० व दि. १२ ऑक्टोबर, २०१०

**शासन निर्णय** :-

मुंबई ग्रामपंचायत अधिनियम १९५८ च्या कलम १३१ व १३२ (अ) मधील तरतुदीनुसार ग्रामपंचायतींना जमीन महसूल व जमीन समानीकरण अनुदाने वितरीत करण्याबाबतची सुधारीत कार्यपध्दती शासनाचे दिनांक २२ एप्रिल १९९२ च्या शासननिर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाकरिता ग्रामपंचायतींना जमीन समानीकरण अनुदान (३६०४०४७९ ) या अनुदानाकरिता रुपये २,०८,६१,०००/- ( रुपये दोन कोटी आठ लक्ष एकसष्ट हजार फक्त ) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यांत आली आहे.

२. सदर तरतुदीतून संदर्भीय शासन , निर्णय दि. ३०.४.२०१० अन्वये ग्रामपंचायतींना जमीन समानीकरणासाठी रक्कम रुपये ३५,३७,०००/- (रुपये पस्तीस लक्ष सदोतीस हजार फक्त) व संदर्भिय शासन निर्णय दि. १२.१०.२०१० अन्वये रु. ८६.६२ लक्ष (रुपये शहाऐंशी लक्ष बासष्ट हजार फक्त) अशी एकूण रु. १२१.९९ लक्ष (रुपये एकशे एकवीस लक्ष नव्याण्णव हजार फक्त) एवढी तरतुद विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यात आली आहे. उर्वरीत अनुदान रु. ८६.६२ लक्ष (रुपये शहाऐंशी लक्ष बासष्ट हजार फक्त) आता या शासन निर्णयाद्वारे खालील विवरणपत्रात रकाना

क्र. ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे विभागीय आयुक्तांकडे सुपूर्द करण्यांत येत आहे.

| अ.क्र. | विभागाचे नाव | प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यांत येत असलेली रक्कम | |
|---|---|---|---|
| | | अंकी(रुपये लाखात ) | रुपये अक्षरी |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कोकण विभाग | ११.१२ | (रुपये अकरा लक्ष बारा हजार फक्त ) |
| २ | नाशिक विभाग | १५.८२ | (रुपये पंधरा लक्ष ब्याऐंशी हजार फक्त ) |
| ३ | पुणे विभाग | १३.१८ | (रुपये तेरा लक्ष अठरा हजार फक्त ) |
| ४ | औरंगाबाद विभाग | २२.३१ | (रुपये बावीस लक्ष एकतीस हजार फक्त ) |
| ५ | अमरावती विभाग | १०.३३ | (रुपये दहा लक्ष तेहतीस हजार फक्त ) |
| ६ | नागपूर विभाग | १३.८६ | (रुपये तेरा लक्ष शहाऐंशी हजार फक्त ) |
| | एकूण | ८६.६२ | (रुपये शहाऐंशी लक्ष बासष्ट हजार फक्त ) |

३. विभागीय आयुक्तांनी या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली अनुदाने संबंधित जिल्हाधिका-यांकडे ग्रामपंचायतींना मंजूर करण्यासाठी त्वरित सूपूर्द करावी व वाटप केलेल्या आदेशांच्या प्रती शासनाकडे पाठवाव्यात. जिल्हाधिकारी यांनी निर्णयात मंजूर केलेल्या तरतूदीपेक्षा जादा खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

४. खर्चाचा मेळ घालण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्तांना पाठवावीत. विभागीय आयुक्तांनी त्या खर्चाचे महालेखापाल महाराष्ट्र १ व २ मुंबई / नागपूर या कार्यालयाशी ताळमेळाचे काम करावे व त्याबाबतचा अहवाल शासनाकडे पाठवावा.

५. यासाठी होणारा खर्च " ३६०४" स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०१ जमीन महसूल २९ भरपाई ,(०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषदा , पंचायत समित्या अधिनियम १९६१ व मुंबई ग्रामपंचायत अधिनियम ,१९५८ अन्वये जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींना जमीन महसूल, जमीन समानीकरण व उपकर अनुदान इत्यादी संबंधात अभिहस्तांकित रकमा देणे ( ३६०४०४७९)(दत्तमत ) (योजनेतर ) ( मागणी क्र. एल -५ ) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हे अनुदान शासनाने या संदर्भात वेळोवेळी निर्देशित केलेल्या विहित अटी व शर्तीच्या अधीन राहील. तसेच ज्या जिल्हा परिषदा/ग्रामपंचायतीकडून शासनाकडे अखर्चित रकमा जमा होणे शिल्लक आहे अशा जिल्हा परिषदा/ ग्रामपंचायतीकडून सदरची अखर्चित रक्कम जमा केल्याची

खातरजमा केल्यानंतरच संबंधित जिल्हा परिषदा/ग्रामपंचायतींना अनुदान वितरीत करण्यांत येईल या अटीच्या अधिन राहील.

७. हा निधी ज्या प्रयोजनांसाठी देण्यात येतो त्या प्रयोजनासाठीच खर्च करण्यात यावा यांची दक्षता घेण्यात यावी. तसेच वितरीत निधीच्या खर्चाचा तपशील दिनांक २० मार्च, २०११ पर्यंत शासनास निश्चितपणे सादर करण्यात यावा. विहित कालावधीत अनुदान खर्च न झाल्यास संबंधितांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल. याची कृपया नोंद घेण्यात यावी.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक-२९/११-व्यय-१५, दि.३१.१.२०११ व अनौपचारिक संदर्भ क्रमाक १२६/११ अर्थ-१७, दि.९.२.२०११, अन्वये दिलेल्या मंजूरी नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. हा शासन निर्णय शासनाच्या www. maharashtra. gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक २०११०२१८१८३६२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( म.सो.खंडारे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) जिल्हाधिकारी (सर्व )
३) मुख्य कार्यकारी अधिकारी. जिल्हा परिषद (सर्व)
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी
६) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्यलेखा व वित्त अधिकारी
७) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.
८) महालेखापाल. महाराष्ट्र -१ . मुंबई (लेखापरिक्षा ) ( ५ जादा प्रतीसह )
९) महालेखापाल . महाराष्ट्र -१. मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता )( ५ जादा प्रतीसह )
१०) महालेखापाल . महाराष्ट्र -२. नागपूर (लेखा परिक्षा ) ( ५ जादा प्रतीसह)
११) महालेखापाल . महाराष्ट्र -२. नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता )( ५ जादा प्रतीसह )
१२) उप मुख्य लेखापरिक्षा,स्थानिक निधी लेखा.कोकण(वाशी /पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर )
१३) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा. कोकण भवन, वाशी , नवी मुंबई
१४) महसूल व वन विभाग
१५) वित्त विभाग. कार्या .(व्यय -१५) व (अर्थसंकल्प -१६)
१६) कार्यासन अधिकारी , ग्राम विकास व जलसंधारण विभाग (का.क्र. वित्त-१, वित्त -७, वित्त -८ )
१७) निवड नस्ती (का.क्र. पंरा-४ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग